सचिव व निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली कार्यालयातील पदांचा सुधारीत आकृतीबंध

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१५/अनौ.३९/प्र.क.१२९/२०-अ**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- २३ नोव्हेंबर,२०२१.

वाचा: १) वित्त विभागाचे क्र. पदनि-२०१९/प्र.क्र.६६/१९/आपुक, दिनांक २४.९.२०१९ चे पत्र व त्यासोबतचे नवीन पदनिर्मिती, पदांचे पुनरुज्जीवन व पदांचे आढावे इत्यादी प्रस्तावांची सखोल तपासणी करण्यासाठी स्थापन केलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक ११.९.२०१९ रोजी झालेल्या सन २०१९ मधील ७ व्या बैठकीचे कार्यवृत्त.

२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय संकीर्ण-२०१५/ अनौ.३९/ प्र.क.१२९/२०-अ, दिनांक २४.८.२०२०

३) अपर मुख्य सचिव व निवासी आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. निआ/ आस्था/१९३-I/२०२०/२३७४, दिनांक २७.१०.२०२०

४) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय संकीर्ण-२०१५/ अनौ.३९/ प्र.क.१२९/२०-अ, दिनांक ९.८.२०२१

५) वित्त विभागाचे क्र. पदनि-२०२१/प्र.क्र.५१/२१/आपुक, दिनांक २३.९.२०२१ चे पत्र व त्यासोबतचे नवीन पदनिर्मिती, पदांचे पुनरुज्जीवन व पदांचे आढावे इत्यादी प्रस्तावांची सखोल तपासणी करण्यासाठी स्थापन केलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक २३.८.२०२१ रोजी झालेल्या सन २०२१ मधील ५ व्या बैठकीचे कार्यवृत्त.

**प्रस्तावना:-**

संदर्भीय क्रमांक २ आणि ४ येथील अनुक्रमे दिनांक २४.८.२०२० व दिनांक ९.८.२०२१ रोजीचे शासन निर्णय रद्द करण्यात येत आहेत.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखाली असलेल्या सचिव व निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांचा सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. महाराष्ट्र सदन कार्यालयाच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेवून सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याबाबतचा प्रस्ताव मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीसमोर ठेवण्यात आला होता. सदर समितीच्या दिनांक ११.९.२०१९ रोजी झालेल्या सन २०१९ मधील ७ व्या बैठकीत सचिव व निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली कार्यालयाच्या पदांचा आकृतीबंध मंजूर केला आहे. त्यानुसार सचिव व निवासी

आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांच्या आकृतीबंधास शासन निर्णय दिनांक २४.८.२०२० अन्वये शासनाची मंजूरी देण्यात आली आहे. तथापि, काही तांत्रिक कारणास्तव सदर आकृतीबंधात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

उच्चस्तरीय सचिव समितीच्या सन २०१९ मधील ७ वी बैठक व सन २०२१ मधील ५ व्या बैठकीतील मान्यतेनुसार आकृतीबंध सुधारीत करण्यात येत आहे.

२. सचिव व निवासी आयुक्त , महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली कार्यालयाच्या आस्थापनेवरील ३३ संवर्गापैकी समान वेतनश्रेणीच्या आधारावर ७ संवर्गाचे २ संवर्ग तयार करण्यात आले आहेत. तसेच ६ संवर्ग मृत संवर्ग घोषित केले असून, एकूण २३ संवर्ग तयार करण्यात आले आहेत.

३. उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक ११.९.२०१९ रोजीच्या ७ व्या व दिनांक २३.८.२०२१ रोजीच्या ५ व्या बैठकीतील मान्यतेस अनुसरुन सचिव व निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन कार्यालयातील ८० नियमित व १अधिसंख्य अशी एकूण ८१ मंजूर पदे तसेच बाहयस्त्रोताद्वारे भरण्यात येणारी ६ पदे मंजूर करण्यात आली आहेत.

४. उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक ११.९.२०१९ रोजीच्या ७ व्या बैठकीत वाहन चालक ६+१ अधिसंख्य पद, लिपिक-टंकलेखक ५+४ नवीन पद तसेच जावकस्वार हे पद मृत संवर्ग दाखविण्यात आले होते. आता संदर्भ क्र. ५ अन्वये उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक २३.८.२०२१ रोजीच्या ५ व्या बैठकीत सचिव व निवासी आयुक्त कार्यालयाच्या आकृतीबंधातील पदसंख्येत बदल करुन लिपिक-टंकलेखक- ६, वाहन चालक-९ व जावकस्वार- १ अशी पदे मंजूर करण्यात आली आहेत.

५. उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक ११.९.२०१९ रोजीच्या सन २०१९ च्या ७ व्या बैठकीतील मान्यतेनुसार सचिव व निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन कार्यालयातील सहायक निवासी आयुक्त (माहिती व तंत्रज्ञान) हा संवर्ग मृत संवर्ग घोषित करण्यात आला आहे. सदर पद शासन निर्णय दिनांक २४.४.२०१२ अन्वये निर्माण करण्यात आले होते. सदर पद राज्य अथवा केंद्रीय सेवेतील समकक्ष पदावर कार्यरत अधिकारी यांच्या प्रतिनियुक्तीने भरण्याची तरतूद या शासन निर्णयात आहे. सहायक निवासी आयुक्त (माहिती व तंत्रज्ञान) या पदाऐवजी सहायक निवासी आयुक्त (गुंतवणूक) हे नवीन पद निर्माण करण्यात आले आहे. त्यामुळे सहायक निवासी आयुक्त (गुंतवणूक) हे पद राज्य अथवा केंद्रीय सेवेतील समकक्ष पदावर कार्यरत अधिकारी यांच्या प्रतिनियुक्तीने भरण्यात येईल.तसेच लघुटंकलेखक (मराठी/इंग्रजी) १ नवीन पद निर्माण करण्यात आले आहे.

६. उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक ११.९.२०१९ रोजीच्या सन २०१९ च्या ७ व्या बैठकीतील मान्यतेनुसार ७ संवर्ग मृत संवर्ग म्हणून घोषित करण्यात आले होते. तथापि, उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक २३.८.२०२१ रोजीच्या ५ व्या बैठकीमध्ये जावकस्वार हे १ पद मंजूर करण्यात आले असल्याने,६ संवर्ग मृत संवर्ग म्हणून घोषित करण्यात येत आहे. विवरणपत्र “ब” मध्ये मृत संवर्ग

दर्शविलेले आहेत. मृत संवर्गामध्ये १६ पदे मंजूर असून त्यापैकी ६ पदांवर कर्मचारी कार्यरत आहेत. त्यातील ५ कर्मचाऱ्यांचे कार्यालयांतर्गत अन्य पदांवर समायोजन करण्यात यावे.तसेच खानसामा या संवर्गांमध्ये १ अधिसंख्य पद निर्माण करण्यात आले आहे. सदर पद संबंधित कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्तीपर्यंत कार्यरत रहाणार आहे. त्यामुळे हे पद अधिसंख्य गणण्यात यावे. सदर पदावरील व्यक्ती सेवानिवृत्ती/राजीनामा/मृत्यु इ. कारणामुळे रिक्त झाल्यानंतर सदर पद निरसित होईल.सदर कर्मचाऱ्याचे वेतन व भत्ते सचिव व निवासी आयुक्त कार्यालयाच्या लेखाशिर्षाखाली त्या कार्यालयाकडून काढले जाईल. दुरध्वनी चालक हा संवर्ग मृत घोषित केल्याने सदर पदावरील कर्मचाऱ्याचे समायोजन करतांना त्यांची वेतनश्रेणी संरक्षित करण्यात यावी. तसेच दूरध्वनी चालक या संवर्गात कार्यरत कर्मचाऱ्यांचे लिपिक-टंकलेखक पदावर समायोजन करतांना संबंधितांनी लिपिक-टंकलेखक संवर्गासाठी आवश्यक असलेली अर्हता धारण करणे आवश्यक राहील. ४ सफाईगार कर्मचाऱ्यांचे कक्षबंध परिचारक पदावर समायोजन करण्यात यावे.

७. कार्यालय अधिक्षक ,वरिष्ठ संपर्क अधिकारी (गुंतवणूक), सहाय्यक व्यवस्थापक व राजशिष्टाचार अधिकारी (वरीष्ठ) हे संवर्ग एकत्रित करुन वरिष्ठ सहायक कक्ष अधिकारी हे सुधारीत पदनाम देण्यात आले आहे. तसेच स्वागत अधिकारी, संपर्क अधिकारी व राजशिष्टाचार अधिकारी हे संवर्ग एकत्रित करुन कनिष्ठ सहायक कक्ष अधिकारी हे सुधारीत पदनाम देण्यात आले आहे.

८. सहाय्यक व्यवस्थापक -४ पदे ( ६ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी रु.९३००-३४८००+ ग्रेड पे रु.४४००) व मल्टी टास्क एक्झीक्युटीव्ह -८ (वेतनश्रेणी सचिव व निवासी आयुक्त , महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली यांच्या आस्थापनेवरील वरिष्ठ लिपिक या पदास अनुज्ञेय असलेल्या वेतनश्रेणीतील (६ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी रु. ५२००-२०२००+ग्रेड पे रु.२४०० ) यानुसार वेतन व भत्ते मिळून येणाऱ्या वित्तलब्धी एवढी रक्कम प्रदान करुन , सदर १२ पदे कंत्राटी पध्दतीने भरण्यास शासन निर्णय दिनांक २४.४.२०१२ अन्वये मान्यता देण्यात आली होती. सदर १२ पदापैकी सहाय्यक व्यवस्थापक-१ पद व मल्टी टास्क एक्झीक्युटीव्ह-५ पदे असे एकूण ६ पदे मनुष्यबळाच्या मर्यादेत गरजेनुसार बाह्यस्त्रोताद्वारे घेण्यास उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक ११.९.२०१९ रोजीच्या ७ व्या बैठकीत समितीने मान्यता दिली आहे. तथापि बाह्यस्त्रोताद्वारे निविदा पध्दतीने मनुष्यबळ घेतांना ते योग्य वेतन मिळणारे व योग्य गुणवत्तेचे असावे. बाह्ययंत्रणेद्वारे सेवा घेतांना, संवर्गनिहाय सेवा घेण्याऐवजी, बहुउद्देशीय स्वरुपाचा (multitasking)कर्मचारी नेमण्याचा प्रयत्न करावा. तसेच सदर पदे भरतांना वित्त विभागाच्या दिनांक २७.१०.२०१०, दिनांक०२.०२.२०१३, दिनांक ०२.१२.२०१३, दिनांक ०२.०८.२०१६ व दिनांक ३०.९.२०२० च्या शासन परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्यात यावे.

९. सहायक लेखाधिकारी हे पद लेखा व कोषागार संचालनालयामार्फत प्रतिनियुक्तीने भरण्यात येईल.

१०. सचिव व निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांकरीता होणारा खर्च २०५२ (०४) (०१) निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन (अनिवार्य) (२०५२०१२३) ०१-वेतन या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

११. हा शासन निर्णय वित्त विभाग अनौ.सं.क्र.५१८/आपुक, दिनांक १८.९.२०१८ व उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक ११.९.२०१९ रोजी झालेल्या सन २०१९च्या ७ व्या बैठकीतील कार्यवृत्तातील मान्यतेस अनुसरुन तसेच वित्त विभाग अनौ.स.क्र.३०/आपुक, दिनांक १८.१.२०२१ व उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक २३.८.२०२१ रोजी झालेल्या सन २०२१च्या ५ व्या बैठकीतील कार्यवृत्तातील मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२१११२४१२५६०५२७०७ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

ASHOK DATTATRAY SALVE

Digitally signed by ASHOK DATTATRAY SALVE
DN: CN = ASHOK DATTATRAY SALVE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2021.11.24 13:00:32 +05'30'

**(अशोक साळवे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत-विवरण पत्र-अ व ब**

**प्रति,**

अपर मुख्य सचिव व निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली

**प्रत,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) अपर मुख्य सचिव (सेवा),सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई-३२
३) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४) प्रधान सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी, मंत्रालय, मुंबई-३२.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९) संचालक, लेखा व कोषागारे, संचालनालय, मुंबई
१०) वित्त विभाग, आपुक/ कोषा-२,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ .
११) निवड नस्ती

## विवरणपत्र-अ

| शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०१५/अनौ.३९/प्र.क्र.१२९/२०-अ, दिनांक २३ नोव्हेंबर,२०२१ चे सहपत्र | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| सचिव व निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली कार्यालयातील मंजूर पदांचा आकृतीबंध | | | | | |
| सध्याचा आकृतीबंध | | | सुधारीत आकृतीबंध | | |
| अ.क्र. | पदनाम | मंजूर पदे | पदनाम | वेतनश्रेणी | मंजूर पदे |
| १ | निवासी आयुक्त व सचिव | १ | निवासी आयुक्त व सचिव | संवर्ग पद | १ |
| २ | आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार) | १ | आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार) | संवर्ग पद | १ |
| ३ | अप्पर निवासी आयुक्त | १ | अप्पर निवासी आयुक्त | संवर्ग पद | १ |
| **गट-अ राजपत्रित** | | | | | |
| ४ | सहायक निवासी आयुक्त (सुरक्षा) | १ | सहायक निवासी आयुक्त (सुरक्षा) | एस-२३: ६७७००-२०८७०० | १ |
| ५ | सहायक निवासी आयुक्त (संपर्क) | १ | सहायक निवासी आयुक्त (संपर्क) | एस-२३: ६७७००-२०८७०० | १ |
| ६ | सहायक निवासी आयुक्त (राजशिष्टाचार) | १ | सहायक निवासी आयुक्त (राजशिष्टाचार) | एस-२३: ६७७००-२०८७०० | १ |
| ७ | सहायक व्यवस्थापक (माहिती व तंत्रज्ञान) | १ | सहायक व्यवस्थापक (माहिती व तंत्रज्ञान) | **(मृत संवर्ग)** | ० |
| ८ | सहायक निवासी आयुक्त (गुंतवणूक) | ० | सहायक निवासी आयुक्त (गुंतवणूक) | एस-२३: ६७७००-२०८७०० | १ (नवीन पद) |
| ९ | सहायक निवासी आयुक्त (प्रशासन) | १ | सहायक निवासी आयुक्त (प्रशासन) | एस-१९: ५५१००-१७५१०० | १ |
| **गट-ब राजपत्रित** | | | | | |
| १० | व्यवस्थापक | १ | व्यवस्थापक | एस-१५: ४१८००-१३२३०० | १ |
| **गट-ब अराजपत्रित** | | | | | |
| ११ | उच्चश्रेणी लघुलेखक (मराठी/इंग्रजी) | ३ | उच्चश्रेणी लघुलेखक (मराठी/इंग्रजी) | एस-१५: ४१८००-१३२३०० | ३ |
| १२ | सहायक लेखाधिकारी | १ | सहायक लेखाधिकारी ( संवर्ग पद) | एस-१५: ४१८००-१३२३०० | १ |
| १३ | कार्यालय अधिक्षक | १ | वरिष्ठ सहायक कक्ष अधिकारी | एस-१४:३८६००-१२२८०० | ३ |
| १४ | वरिष्ठ संपर्क अधिकारी (गुंतवणूक) | १ | | | |
| १५ | सहाय्यक व्यवस्थापक | ३ | | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १६ | राजशिष्टाचार अधिकारी (वरिष्ठ) | १ | | | |
| १७ | निम्नश्रेणी लघुलेखक (इंग्रजी) | १ | निम्नश्रेणी लघुलेखक (इंग्रजी) | एस-१४:३८६००-१२२८०० | १ |
| १८ | उप लेखापाल | १ | उप लेखापाल | एस-१३: ३५४००-११२४०० | १ |
| १९ | स्वागत अधिकारी | ७ | कनिष्ठ सहायक कक्ष अधिकारी | एस-१३: ३५४००-११२४०० | ८ |
| २० | संपर्क अधिकारी | १ | | | |
| २१ | राजशिष्टाचार अधिकारी | १ | | | |
| **गट-क** | | | | | |
| २२ | लघुटंकलेखक (मराठी/इंग्रजी) | १ | लघुटंकलेखक (मराठी/इंग्रजी) | एस-८: २५५००-८११०० | १+१ (नवीन पद) |
| २३ | वरिष्ठ लिपिक/ रोखपाल | ५ | वरिष्ठ लिपिक/ रोखपाल | एस-८: २५५००-८११०० | ४ |
| २४ | दुरध्वनी चालक | ४ | दुरध्वनी चालक | **(मृत संवर्ग)** | ० |
| २५ | लिपिक -टंकलेखक | ५ | लिपिक -टंकलेखक | एस-६: १९९००-६३२०० | ५+१ (नवीन पद) |
| २६ | वाहन चालक | १२ | वाहन चालक | एस-६: १९९००-६३२०० | ९ |
| **गट-ड** | | | | | |
| २७ | प्लंबर | १ | प्लंबर | **(मृत संवर्ग)** | ० |
| २८ | जावकस्वार | १ | जावकस्वार | एस-५:१८०००-५६९०० | १ |
| २९ | खानसामा | ३ | खानसामा (मृत संवर्ग) | एस-३: १६६००-५२४०० | १ (अधिसंख्य पद) |
| ३० | नाईक | १ | नाईक | **(मृत संवर्ग)** | ० |
| ३१ | शिपाई | ६ | शिपाई | एस-१: १५०००-४७६०० | ६ |
| ३२ | कक्षबंध परिचारक | २६ | कक्षबंध परिचारक | एस-१: १५०००-४७६०० | २६ |
| ३३ | सफाईगार | ६ | सफाईगार | **(मृत संवर्ग)** | ० |
| | | **१०१** | | | **८१ (८० नियमित +१ अधिसंख्य)** |

**टिप:-** अ.क्र.२१ खानसामा हे एक पद अधिसंख्य पद म्हणून गणण्यात यावे.सदर पद संबंधित कर्मचाऱ्याच्या सेवानिवृत्तीपर्यंत कार्यरत रहाणार आहे. सदर पदावरील व्यक्ती सेवानिवृत्त/ राजीनामा/ मृत्यु इ. कारणामुळे रिक्त झाल्यानंतर ते पद निरसित होईल.

२. तसेच महाराष्ट्र सदन या कार्यालयामध्ये खालील सेवा त्यापुढे दर्शविलेल्या मनुष्यबळाच्या मर्यादेत गरजेनुसार बाह्यस्रोताद्वारे घेण्यास मान्यता देण्यात आली आहे.

| **अ.क्र.** | **सेवा** | **संख्या** |
|---|---|---|
| १ | सहाय्यक व्यवस्थापक | १ |
| २ | मल्टी टास्क एक्झीक्युटीव्ह | ५ |
| | **एकूण** | **६** |

ASHOK DATTATRAY SALVE

Digitally signed by ASHOK DATTATRAY SALVE
DN: CN = ASHOK DATTATRAY SALVE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2021.11.24 13:00:57 +05'30'

**( अशोक साळवे )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

## विवरणपत्र-ब

सुधारीत आकृतीबंधामध्ये खालील नमूद एकूण ६ संवर्ग मृत संवर्ग म्हणून घोषित करण्यात आले आहेत. सदर ६ संवर्गामध्ये सध्या एकूण १६ पदे मंजूर आहेत. त्यापैकी १० पदे रिक्त आहे ती तात्काळ प्रभावाने निरसित होतील. उर्वरित ६ पदांवर कर्मचारी कार्यरत आहेत. त्यामुळे सदर कर्मचाऱ्यांचे कार्यालयांतर्गत अन्य पदावर समायोजन करण्याबाबत उचित कार्यवाही करण्यात यावी.

| अ.क्र. | पदनाम | मंजूर पदे | कार्यरत पदे | रिक्त पदे |
|---|---|---|---|---|
| १ | सहायक व्यवस्थापक (माहिती व तंत्रज्ञान) | १ | ० | १ |
| २ | दुरध्वनी चालक | ४ | १ | ३ |
| ३ | प्लंबर | १ | ० | १ |
| ४ | खानसामा | ३ | १ | २ |
| ५ | नाईक | १ | ० | १ |
| ६ | सफाईगार | ६ | ४ | २ |
| **एकूण** | | **१६** | **६** | **१०** |

ASHOK DATTATRAY SALVE

Digitally signed by ASHOK DATTATRAY SALVE
DN: CN = ASHOK DATTATRAY SALVE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2021.11.24 13:01:13 +05'30'

**(अशोक साळवे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**